**राज्य मागास वर्ग आयोगावरील सदस्य सचिवांकरिता समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सह संचालक समाज कल्याण संवर्गाचे एक नियमित स्वरूपाचे पद निर्माण करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ,**
**शासन निर्णय क्रमांक :- सकआ-२०१८/प्र.क्र.२५२/आस्था-२,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑक्टोबर, २०१८.

***वाचा*** :१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र. सीबीसी १०/२००१/प्र.क्र.१००/मावक-५, दि.१२.१.२००४.

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र. सीबीसी १०/२००१/प्र.क्र.१००/मावक-५, दि.१२.५.२००४.

३) सन २००६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३४, दि.१४.८.२००६

४) शासन शुध्दीपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. सीबीसी १०/ २०१०/ प्र.क्र.६७६/मावक-५, दि.४.११.२०११.

**पार्श्वभूमी : -**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्गाच्या यादीमध्ये जातीचा समावेश करणे किंवा वगळण्यासाठी आलेल्या मागण्या व तक्रारीबाबत तपासणी व शिफारशी करण्यासाठी राज्य मागासवर्ग आयोगाची स्थापना शासन आदेश दि.१२.१.२००४ अन्वये करण्यात आलेली आहे. त्यानुसार आयोगाची खालीलप्रमाणे रचना निश्चित करण्यात आली आहे-

| | |
|---|---|
| अध्यक्ष | - १ (सेवा निवृत्त न्यायाधीश) |
| सदस्य | - ६ (अशासकीय - प्रत्येक महसूल विभागातील १ याप्रमाणे) |
| सदस्य सचिव | - १ (शासकीय) |

त्यानुसार सदस्य सचिव समाज कल्याण संचालनातील सह संचालक दर्जाचा असावा, अशी तरतूद करण्यात आली आहे.

२. शासन निर्णय दि.१२.५.२००४ अन्वये आयोगाचे सदस्य सचिव म्हणून संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग हे असतील अशी सुधारणा करण्यात आली. मात्र त्यानंतर महाराष्ट्र शासन असाधारण राजपत्र दि.१४.८.२००६ मध्ये सामाजिक न्याय विभागातील सहसंचालक या दर्जापेक्षा कमी दर्जाचा नसलेला व जो राज्य शासनाचा अधिकारी आहे किंवा होता असा सदस्य सचिव राहील, असे नमूद करण्यात आले आहे. तसेच, शासन निर्णय दि.४.११.२०११ अन्वये आयोगाचे सदस्य सचिव म्हणून संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग ऐवजी सह संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय हे असतील अशी सुधारणा करण्यात आली आहे.

३. सद्य:स्थितीत राज्य मागास वर्ग आयोगाकडे मराठा आरक्षण तसेच इतर आरक्षणांच्या अनुषंगाने कार्यवाही सुरू असून आयोगाच्या सदस्य सचिव पदावर नियमित अधिकाऱ्याची नियुक्ती

करणे अत्यंत आवश्यक आहे. तसेच राज्य मागासवर्ग आयोगाच्या कामाचा आवाका पाहता आयोगाचे सदस्य सचिव हे पद अतिरिक्त कार्यभारातून न भरता सदर पदावर पुर्णवेळ अधिकारी असणे अत्यंत आवश्यक आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, राज्य मागास वर्ग आयोगाकरिता सदस्य सचिव म्हणून समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सह संचालक समाज कल्याण, वेतनश्रेणी १५,६००-३९,१००, ग्रेड पे ७६०० या संवर्गाचे नियमित स्वरूपाचे १ पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मागास वर्ग आयोगाकरिता सदस्य सचिव म्हणून समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सह संचालक समाज कल्याण, वेतनश्रेणी १५,६००-३९,१००, ग्रेड पे ७६०० या संवर्गाचे नियमित स्वरूपाचे १ पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र राज्य मागास वर्ग आयोगाकरिता सदस्य सचिवाचे समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सह संचालक समाज कल्याण, वेतनश्रेणी १५,६००-३९,१००, ग्रेड पे ७६०० या संवर्गाचे नियमित स्वरूपाचे एक पद निर्माण करण्यास एकूण रू.१०.१० लक्ष इतका वार्षिक आर्थिक भार येणार आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.४०१/व्यय १४, दिनांक ३.१०.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र.५५१/आपुक, दि.१६.१०.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२४१७१९१५६३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.10.24 17:26:35 +05'30'

**(अ. कों. आहिरे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री /मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राद्वारे)

८. सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सह/ उप/ अवर सचिव/कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.आयुक्त, समाज कल्याण, पुणे
११.आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
१२.राज्य मागास वर्ग आयोग, पुणे
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५.निवड नस्ती /आस्था-२